शिवछत्रपती क्रीडा पुरस्कार व अन्य क्रीडा पुरस्कार वितरण समारंभ आयोजनासाठी निधी उप्लब्ध करुन देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांक : पुरवणी ३५१८/प्र.क्र.१४८/क्रीयुसे -२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : १३ फेब्रुवारी, २०१९

**वाचा-**

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक राक्रीधो २०१२/प्र.क्र.१५८/१२/क्रीयुसे-२, दि. १६ ऑक्टोबर, २०१७
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक अनुवि ४९१८/प्र.क्र.४२/ अर्थसंकल्प, दि. ०४ एप्रिल, २०१९
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,पुणे यांचे पत्र क्र.क्रीयुसे/शिछक्रीपु/का-१४/२०१८-१९; दि.१९.१२.२०१८

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र राज्यातील नामवंत सर्वोत्कृष्ट क्रीडापटूंना शिवछत्रपती राज्य क्रीडा जीवन गौरव पुरस्कार, उत्कृष्ट क्रीडा मार्गदर्शक पुरस्कार, शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार( खेळाडू, संघटक / कार्यकर्ते). एकलव्य राज्य क्रीडा पुरस्कार, सहासी क्रीडा पुरस्कार व जिजामाता क्रीडा पुरस्कार प्रदान करण्याची योजना सन १९८८-८९ पासून कार्यन्वित आहे. उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सदर पुरस्कारांसाठीची नियमावली सुधारीत करण्यात आली आहे.

या नुसार सन २०१७-१८ या वर्षासाठीचे पुरस्कार दि. १७ फेब्रुवारी, २०१९ रोजी मा. राज्यपाल यांच्या उपस्थितीत आयोजित करण्यात येणार आहे. सदर समारंभ आयोजनासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

सन २०१७-१८ या वर्षासाठी देण्यात येणाऱ्या शिवछत्रपती राज्य क्रीडा पुरस्कार व अन्य क्रिडा पुरस्काराची रक्कम व वितरण समारंभ या वरिल खर्च भागविण्यासाठी रु.१०५.७४ लक्ष (रुपये एक कोटी पाच लाख चौऱ्याहत्तर हजार फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. तसेच संदर्भाधीन क्र.०२ च्या शासन निर्णयान्वये वितरीत केलेली रु.५५.०९लक्ष व या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेली रु. १०५.७४ लक्ष असे एकून रु.१६०.८३ लक्ष (रुपये एक कोटी साठ लाख त्र्याऐंशी हजार फक्त) राज्य क्रीडा पुरस्कार समारंभांचे आयोजन, या योजनेवर खर्च करण्यास व प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च “मागणी क्र. ०३, २२०४-क्रीडा व युवक सेवा- १०४ क्रीडा व खेळ (०३) क्रीडा पुरस्कार (०३) (०१) राज्य क्रीडा पुरस्कार समारंभांचे आयोजन, (अनिवार्य) (२२०४-१५६९), ५० इतर खर्च” या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदी मधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

४. वित्त विभागाच्या दि. २५.०१.२०१९ व दि. ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील अटी व सूचनानुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित उपसंचालक/ लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (क्रीडा )यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.८९/व्यय-५: दि.१९.१०.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१३१०२५०४२७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2019.02.13 14:43:05 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा यांचे खाजगी सचिव
२) मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, (क्रीडा संचालनालयामार्फत).
७) सर्व उप संचालक, क्रीडा व युवक सेवा, (क्रीडा संचालनालयामार्फत).
८) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी, ( क्रीडा संचालनालयामार्फत)
९) वरीष्ठ कोषागार अधिकारी, पुणे( क्रीडा संचालनालयामार्फत)
१०) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
११) उप सचिव (क्रीडा)/ अवर सचिव (क्रीयुसे १ व ३) / कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवडनस्ती, क्रीयुसे-२.